वनवृत्तांकरीता पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक- आयएफएस-२०१२/१३५/प्र.क्र.३४/फ-७**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १४ जुलै, २०१५

संदर्भ :- १. शासन समक्रमांकाचे दिनांक १४ जून, २०१३ चे परिपत्रक

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक(वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. भावसे /असायमेंट /प्र.क्र.१२४ (८९-९०) /भाग-६ /कक्ष-९/७१४ /१५-१६, दिनांक १७ जून, २०१५

**परिपत्रक :-**

राज्यात वन विभागांतर्गत सदय:स्थितीत ११ प्रादेशिक वनवृत्त आहेत. प्रादेशिक वनवृत्तांच्या प्रशासनावर संनियंत्रण ठेवण्यासाठी तसेच प्रशासनात गतिमानता आणण्यासाठी प्रत्येक प्रादेशिक वनवृत्तासाठी संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये एक पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक नियुक्त करण्यात आले आहेत. लोकाभिमुख व गतिमान प्रशासन हा शासनाचा उददेश सफल होण्याच्या दृष्टीने पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांची भूमिका महत्वपूर्ण आहे. लोकाभिमुख प्रशासनामूळे शासनाचे जनतेच्या प्रती उत्तरदायित्व वाढलेले आहे. प्रशासनात पूर्णपणे पारदर्शकता व गतिमानता यावी या दृष्टीकोनातून पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांच्या जबाबदारीत वाढ करणे, आवश्यकतेप्रमाणे पुनर्वाटप करणे व कालानूरूप प्रशासकिय कामकाजात झालेले बदल यानूषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. उक्त पाश्‍र्वभूमीवर शासन आता पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक नियूक्तीचे यापूर्वी निर्गमित शासन परिपत्रक अधिक्रमित करून नव्याने खालीलप्रमाणे वनवृत्तांचे वाटप तसेच त्यांनी पार पाडावयाच्या कामाबाबतच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करीत आहे.

**अ. प्रादेशिक वनवृत्तनिहाय पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक यांची पुढीलप्रमाणे नियुक्ती करण्यात येत आहे.**

| अ.क्र. | वनवृत्त | पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक |
|---|---|---|
| १. | नाशिक | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) |
| २. | धुळे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ठ वनोपज, संनियंत्रण व मुल्यांकन) |
| ३. | पुणे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) |

| अ.क्र. | वनवृत्त | पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक |
|---|---|---|
| ४. | औरंगाबाद | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व प्रसिध्दी) |
| ५. | अमरावती | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग) |
| ६. | यवतमाळ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संसाधन उपयोग) |
| ७. | नागपूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (केंद्रस्थ अधिकारी) |
| ८. | कोल्हापूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कॅम्पा) |
| ९. | ठाणे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) |
| १०. | चंद्रपूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) |
| ११. | गडचिरोली | |

**ब. पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक त्यांच्याशी संबधीत वनवृत्ताकरीता पुढीलप्रमाणे कामकाज पार पाडतील.**

**I.** प्रत्येक महिन्यात वनवृत्तात क्षेत्रीय दौरे करून कामांचे निरीक्षण करावे तसेच वनवृत्तांचा सर्वंकष आढावा घ्यावा. तथापि, पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक म्हणून जबाबदारी पार पाडताना आपल्या नियमित कामकाजावर त्याचा विपरीत परिणाम होणार नाही याची दक्षता घ्यावी. शासन स्तरावर आयोजित करण्यात येत असलेल्या विविध बैठका, व्हिडिओ कॉन्फरन्स इ. करीता कोणत्याही परिस्थितीत अनुपस्थित राहू नये. सबब सदर बैठका विचारात घेवून क्षेत्रीय भेटीचे नियोजन करावे.

**II.** वनवृत्तातील सर्व विभागांना दोन महिन्यातून किमान एकदा भेट देणे आवश्यक राहील. क्षेत्रीय भेटीनंतर त्याबाबतचा अहवाल लगतच्या दुस-या दिवशी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) यांना सादर करण्यात यावा.

**III.** पालक अपर प्रधान मुख्य वनसरक्षक त्यांच्या कडे सोपविलेल्या वन वृत्तांशी संबधीत खालील बाबींचा नियमितपणे आढावा घेतील.

i. प्रादेशिक वनवृत्तातील योजना/योजनेतर, कॅम्पा व अर्थसंकल्पाशी निगडीत सर्व कामे, वन विकास यंत्रणा, संयुक्त वन व्यवस्थापन समिती संबधित निधी वितरण व खर्च तसेच रोपवनांशी संबधीत सर्व कामे, मुल्यांकन, अवैध शिकार, अवैध वृक्ष तोड इ. बाबींवर संनियंत्रण ठेवणे.

ii. केआरए/कार्य मुल्यांकन (work-plan) मध्ये निश्चित केलेल्या उदिदष्टांनूसार प्रत्येक बाबींवर संनियंत्रण ठेवून संबधीतांना मार्गदर्शक करणे.

iii. वनवृत्तातील प्रलंबित शिस्तभंग विषयक प्रकरणे, निलंबन, पदोन्नती, सेवानिवृत्ती वेतन, रिक्त पदे, भरती इ. आस्थापना विषयक बाबी, वन मजूरांची प्रलंबित देयके तसेच इतर मागण्यांच्या अनुषंगाने संबधीत कर्मचारी/कामगार संघटनाशी समन्वय इ.

iv. वनवृत्तातील कुप डिमार्केशन, वृक्षांची छापणी व तोड, वनोपज वाहतूक, टिंबर अकॉउन्ट, लाकूड आगार व्यवस्थापन, कुप कंट्रोल फार्म व कंपार्टमेंट हिस्ट्री फार्म अदयावत करणे, FLCS (जकांस) च्या कामावर संनियंत्रण तसेच त्यांचे हिशोब अदयावत करणे, वनवृत्तातीन वन जमिन विषयक अभिलेख, कलम ४/कलम २० अंतर्गत अधिसूचना जाहीर करणे, वन हक्क विषयक प्रकरणे, FSO चे कामकाज इ.

v. केंद्र व राज्य शासनाकडील प्रगती, ई-समीक्षा, मैत्री, वॉर रूम, प्रोजेक्ट मॉनिटरींग ग्रुप आपले सरकार इ. पोर्टलवरील प्रकरणे, महत्वपूर्ण न्यायालयीन व लोकायुक्त प्रकरणे इत्यादी.

vi. शासन स्तरावरून पाठपुरावा करण्यात येणारी महत्वाची प्रलंबित प्रकरणे, मा. मुख्यमंत्री कार्यालयाच्या विशेष कार्य कक्षाशी (विकाक) संबंधीत संदर्भ, मा. मंत्री महोदय, खासदार, आमदार इ. यांच्याकडून प्राप्त संदर्भ, तसेच विधान मंडळ विषयक तारांकित प्रश्न, अतारांकित प्रश्न, आश्वासने, कपात सूचना, लक्षवेधी सूचना, अर्धा तास सूचना इ. कामकाजांचे समन्वय.

vii. सामाजिक वनीकरण,वन्यजीव, कार्य आयोजना, प्रशिक्षण संस्था यांच्याशी समन्वय राखून वनवृत्तांशी संबधीत अडी अडचणींचा निपटारा करणे.

viii. शासन स्तरावरील वनवृत्ताशी संबधित प्रकरणांचा निपटारा करण्याकरीता शासनाशी समन्वय राखणे, प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयातील अन्य अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक यांच्याशी समन्वय साधून वनवृत्तांशी संबधित प्रकरणे निकाली काढण्याकरीता प्रयत्न करणे.

ix. संबधीत विभागीय आयुक्त, महानगर पालिका आयुक्त इ. यांच्याशी संपर्क साधून वनवृत्तांशी संबधीत बाबींकरीता त्यांच्याशी कायम समन्वय राहील यांकरीता दक्षता घेणे.

x. केंद्र शासनास सादर कार्य आयोजना मंजूर होण्याच्या दृष्टीने तसेच शासनाच्या दृष्टीने महत्वाच्या प्रकरणाबबात क्षेत्रीय कार्यालय (RO), नागपूर यांच्याकडे पाठपुरावा करणे.

xi. या व्यतिरिक्त शासनाकडून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या सूचना नुसार कार्यवाही करणे.

३.    सदर परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून संबधीत पालक अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक त्यांच्याकडे सोपविण्यात आलेल्या वनवृत्तातील अधिका-यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदित, पुनर्विलोकित करण्याचे काम पार पाडतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०७१४१७२२२११७१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.07.14 17:23:58 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )

मुख्य वन संरक्षक (मंत्रालय)

महसूल व वन विभाग

**प्रत:-**

१. प्रधान मुख्य वन संरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. सर्व प्रधान मुख्य वनसरंक्षक/ अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक/ मुख्य वन संरक्षक/वन संरक्षक/उप वनसंरक्षक/विभागीय वन अधिकारी/उप विभागीय वन अधिकारी.
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. निवडनस्ती फ-७.